201106101044100 1

# महाराष्ट्र शासन

तात्काळ

क्रमांक:-एमएमसी-५००७/२६७/प्र.क्र.७१/२००७/नवि-३२
नगर विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- १० मे, २०११

प्रति,
(१) सर्व महानगरपालिकांचे महापौर,
(२) प्रधान सचिव, राज्य निवडणूक आयोग,नवीन प्रशासन भवन,मुंबई
(३) सर्व महानगरपालिका आयुक्त,
(४) आयुक्त तथा संचालक नगर परिषद प्रशासन संचालनालय,वरळी,मुंबई,
(५) सर्व विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक नगरपरिषद प्रशासन संचालनालय
(६) सर्व जिल्हाधिकारी,
(७) सर्व नगर परिषदा / नगर पंचायती यांचे मुख्याधिकारी,
(८) प्रबंधक,मुंबई उच्च न्यायालयाची सर्व खंडपीठे,(यादीप्रमाणे),
(९) प्रबंधक, सर्व जिल्हा न्यायालये व राज्यातील इतर न्यायालये(यादीप्रमाणे)
(१०)महासंचालक,माहिती व जनसंपर्क संचालनालय,मंत्रालय,मुंबई,
(११) संचालक, अखिल भारतीय स्थानिक स्वराज्य संस्था,एम.एन.रॉय कॅम्पस,टी.पी.एस.रोड, वांद्रे (पूर्व ),मुंबई-४०० ०५१.

विषय:- सन २०११ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक -९

महोदय,

इमारतीचा दर्शनी व बाहय भाग सुस्थितीत ठेवण्याकरीता प्रत्येक मालक व भोगवटादार यांची जबाबदारी निश्चित करण्याबाबत तसेच महानगरपालिका व नगरपरिषदांना सार्वजनिक हिताच्या बाबींवर निर्देश देण्याबाबत महानगरपालिका व नगरपरिषद अधिनियमामध्ये तरतूदी करणारा सन २०११चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ९, दिनांक ३ एप्रिल,२०११ रोजी शासन राजपत्रात प्रसिध्द करण्यात आला आहे. प्रस्तुत अधिनियमाची प्रत आपल्या माहितीसाठी व आवश्यक कार्यवाहीसाठी सोबत पाठविण्यात येत आहे.

आपला,

( आ.श्रा.जिवने )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत सादर अग्रेषित(अधिनियमाच्या इंग्रजी व मराठी प्रतीसह)
(१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
(२) मा.राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव,
(३) प्रधान सचिव(नवि-१) (नगर विकास विभाग),मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक,
(४) प्रधान सचिव (नवि-२)(नगर विकास विभाग),मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक,
(५) नगर विकास विभागातील सहसचिव/ उपसचिव/ अवर सचिव/ कक्ष अधिकारी,
(६) वेब कोऑर्डिनेटर(नवि-२९),नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई-३२,
(७) निवडनस्ती (नवि-३२).

-----------

20110610104411001

RNI No. MAHBIL/2009/35530



# महाराष्ट्र शासन राजपत्र
# असाधारण भाग चार

वर्ष ३, अंक ३(४) ] रविवार, एप्रिल ३, २०११/चैत्र १३, शके १९३३ [ पृष्ठे १४, किंमत रुपये २०.००

असाधारण क्रमांक २४

प्राधिकृत प्रकाशन

**महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम.**

**अनुक्रमणिका**



दिनांक १ एप्रिल २०११ रोजी मा. राज्यपालांनी संमती दिलेला महाराष्ट्र विधानमंडळाचा पुढील अधिनियम माहितीसाठी, याद्वारे, प्रसिद्ध करण्यात येत आहे.

**ह. बा. पटेल,**
सचिव,
महाराष्ट्र शासन,
विधी व न्याय विभाग.

---

**सन २०११ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ९.**

(मा. राज्यपालांची संमती मिळाल्यानंतर **महाराष्ट्र शासन राजपत्रात** दिनांक ३ एप्रिल २०११ रोजी प्रथम प्रसिद्ध केलेला अधिनियम.)

**मुंबई महानगरपालिका अधिनियम, मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९, नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ आणि महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ यांमध्ये आणखी सुधारणा करण्याकरिता अधिनियम.**

१८८८ चा मुंबई ३. १९४९ चा मुंबई ५९. १९५० चा मध्य प्रांत व वऱ्हाड २. १९६५ चा महा. ४०.

**ज्याअर्थी,** यात यापुढे दिलेल्या प्रयोजनांसाठी, मुंबई महानगरपालिका अधिनियम, मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९, नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ आणि महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ यांमध्ये आणखी सुधारणा करणे इष्ट आहे ; **त्याअर्थी,** भारतीय गणराज्याच्या एकसष्टाव्या वर्षी, याद्वारे, पुढील अधिनियम करण्यात येत आहे :—

## प्रकरण एक

### प्रारंभिक.

संक्षिप्त नाव व प्रारंभ.

**१.** (१) या अधिनियमास, महाराष्ट्र महानगरपालिका आणि नगरपरिषदा (सुधारणा) अधिनियम, २०१०, असे म्हणावे.

(२) तो, राज्य शासन, राजपत्रातील अधिसूचनेद्वारे, नेमून देईल अशा दिनांकास अंमलात येईल आणि या अधिनियमाच्या वेगवेगळ्या तरतुदींसाठी आणि वेगवेगळ्या क्षेत्रांसाठी वेगवेगळे दिनांक नेमून देता येतील.

## प्रकरण दोन

### मुंबई महानगरपालिका अधिनियमाची सुधारणा.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ यामध्ये ३५४अब आणि ३५४अक ही कलमे समाविष्ट करणे.

**२.** मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या (यात यापुढे, या प्रकरणात, ज्याचा निर्देश " मुंबई महानगरपालिका अधिनियम " असा करण्यात आला आहे) कलम ३५४अअ नंतर, पुढील कलमे समाविष्ट करण्यात येतील :— १८८८ चा मुंबई ३.

इमारतीचा दर्शनी भाग सुस्थितीत ठेवणे व तसा राखणे ही मालक किंवा भोगवटादार यांची जबाबदारी असणे.

**" ३५४अब.** (१) इमारतीचा दर्शनी भाग सुस्थितीत ठेवण्यात व तसा राखण्यात आला आहे आणि तो नादुरुस्त स्थितीत नाही, अथवा ज्यामुळे इमारतीचे वा तिच्या भागाचे दर्शनी स्वरूप खराब होते अशा प्रकारचे तडे, डाग, गचाळपणे बंदिस्त केलेल्या जागा, लटकत्या तारा वा केबल किंवा अपायकारक वस्तू ठेवणे यांमुळे तो खराब झालेला नाही, याची खातरजमा करणे ही प्रत्येक इमारत मालकाची किंवा भोगवटादाराची जबाबदारी असेल :

परंतु, या कलमातील कोणतीही गोष्ट, महाराष्ट्र झोपडपट्टी (सुधारणा, निर्मूलन व पुनर्विकास) अधिनियम, १९७१ याच्या कलम ४ च्या पोट-कलम (१) अन्वये झोपडपट्टी क्षेत्र म्हणून घोषित करण्यात आलेल्या क्षेत्रांना तसेच ज्या इमारतींच्या बाबत सक्षम प्राधिकरणाने पुनर्विकास आराखडा मंजूर केला आहे किंवा तो सक्षम प्राधिकरणाच्या विचाराधीन आहे, अशा इमारतींना लागू असणार नाही. १९७१ चा महा. २८.

(२) आयुक्ताने अशा इमारतीची किंवा तिच्या भागाची तपासणी केल्यावर अशा कोणत्याही इमारतीचा किंवा तिच्या भागाचा दर्शनी हिस्सा सुस्थितीत ठेवण्यात व तसा राखण्यात आलेला नाही आणि पोट-कलम (१) मध्ये नमूद केलेल्या कोणत्याही कारणांमुळे तो खराब झालेला आहे असे आयुक्तांचे मत बनले तर, लेखी नोटिशीद्वारे त्या इमारतीच्या मालकाला किंवा भोगवटादाराला, त्या इमारतीचा दर्शनी भाग सुस्थितीत ठेवण्यासाठी व तसा राखण्यासाठी त्या नोटिशीमध्ये विनिर्दिष्ट करण्यात येईल असे आवश्यक काम पार पाडण्यास फर्मावता येईल ; आणि तो मालक किंवा, यथास्थिति, भोगवटादार त्या नोटिशीचे पालन करील.

(३) इमारतीचा मालक किंवा भोगवटादार, पोट-कलम (२) अन्वये आयुक्ताने दिलेल्या नोटिशी मध्ये नमूद केलेले काम, नोटीस मिळाल्याच्या दिनांकापासून तीस दिवसांच्या आत, किंवा पार पाडावयाच्या कामाचे स्वरूप व व्याप्ती विचारात घेऊन आयुक्त विनिर्दिष्ट करील अशा वाढीव कालावधीच्या आत, पार पाडील.

(४) मालकाने किंवा, यथास्थिति, भोगवटादाराने पोट-कलम (२) खालील नोटिशीचे पालन करण्यात कसूर केली तर, आयुक्त नोटिशीमध्ये नमूद केलेले काम पार पाडण्याची व्यवस्था करील आणि मालक किंवा, यथास्थिति, भोगवटादार, आयुक्ताने त्याबाबतीत केलेला खर्च, मागणी नोटीस मिळाल्याच्या दिनांकापासून तीस दिवसांच्या आत देण्यास जबाबदार असेल आणि अशा मालकाने किंवा भोगवटादाराने खर्च देण्यात कसूर केली तर अशा खर्चाची संपूर्ण रक्कम वसूल होईपर्यंत आयुक्ताने खर्च केलेल्या रकमेवर प्रत्येक महिन्याकरिता किंवा त्याच्या भागाकरिता दोन टक्के या दराने व्याज आकारण्यात येईल.

(५) या कलमामध्ये अन्यथा तरतूद केली असेल त्याव्यतिरिक्त अशा खर्चाची रक्कम, कोणतेही व्याज असल्यास त्यासह, मालमत्ता कर म्हणून देय असल्याप्रमाणे वसूल करण्यात येईल.

(६) पोट-कलम (४) अन्वये खर्चाच्या ज्या रकमेची मागणी करण्यात आली असेल त्या रकमेविषयी कोणताही विवाद असेल तर, मुख्य न्यायाधीश, लघुवाद न्यायालय यांच्याकडे अपील करता येईल, परंतु,—

(एक) अशा मागणीची नोटीस मिळाल्याच्या दिनांकापासून एकवीस दिवसांच्या आत ते अपील दाखल करण्यात आले नसेल तर ;

(दोन) मागणी करण्यात आलेली रक्कम महानगरपालिकेकडे जमा करून अशाप्रकारे रक्कम जमा करण्यात आल्याबाबतच्या पावतीची सत्य प्रत अपिलासोबत जोडण्यात आली नसेल तर,

मुख्य न्यायाधीश असे कोणतेही अपील विचारार्थ स्वीकारणार नाही.

(७) जर अपिलावर अपीलकर्त्याच्या बाजूने निर्णय देण्यात आला असेल आणि महानगरपालिकेकडे जमा करण्यात आलेली खर्चाची रक्कम ही, अपीलकर्त्याने द्यावयाच्या रकमेपेक्षा अधिक असेल तर, आयुक्त, ती जादा रक्कम अपीलकर्त्याने अशाप्रकारे जमा केल्याच्या दिनांकापासून दर साल ६.२५ टक्के व्याजासह अशा इमारतीच्याबाबतीत मालकाने त्यानंतर द्यावयाचा मालमत्ता कर म्हणून समायोजित करील.

शहरी सौंदर्याचा सुरेख मिलाफ साधण्याबाबत घोषणा करण्याचा आयुक्तांचा अधिकार.

**३५४अक.** (१) आयुक्तास, राज्य शासनाची मान्यता मिळविल्यानंतर, **राजपत्रातील** अधिसूचनेद्वारे आणि दोनपेक्षा कमी नसतील इतक्या स्थानिक वृत्तपत्रांमधील जाहिरातीद्वारे, अशी घोषणा करता येईल की, एखाद्या विशिष्ट शहरी भागाचे वास्तुशास्त्रीय स्वरूप जपण्याबरोबरच तेथे सौंदर्याचा सुरेख मिलाफ साधण्यासाठी तसेच त्याच्या स्वरूपात सौंदर्यात्मक सुधारणा करून ते अधिक सुशोभित करण्यासाठी, अशा घोषणेच्या प्रसिद्धीच्या दिनांकास अस्तित्वात असलेल्या किंवा त्यानंतर बांधून पूर्ण करण्याचे प्रस्तावित केलेल्या आणि अशा घोषणेमध्ये विनिर्दिष्ट केलेल्या महानगरपालिका क्षेत्रामधील कोणत्याही वसतिक्षेत्रातील अथवा त्याच्या भागातील कोणत्याही सडकेवर स्थित असलेल्या कोणत्याही इमारतीचे वा इमारतींचे दर्शनी स्वरूप, त्यावर कोणत्याही जोडण्या असल्यास आणि त्यांच्या सीमेच्या भिंती, कोणत्याही असल्यास, त्यासह, अशा घोषणेमध्ये नमूद करण्यात येईल अशा रीतीने आणि अशा कालावधीत ठेवण्यात व राखण्यात येईल.

(२) पोट-कलम (१) खालील घोषणेची अधिसूचना प्रसिद्ध करण्यापूर्वी, आयुक्त, अशी घोषणा करण्याचा त्याचा उद्देश स्पष्ट करणारी आणि उक्त प्रस्तावावर कोणताही आक्षेप घेणाऱ्या अथवा त्यावर कोणतीही सूचना करण्यास इच्छुक असलेल्या सर्व व्यक्तींनी त्याबाबतची कारणे देऊन, अशी सूचना राजपत्रात प्रसिद्ध झाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत, आयुक्ताकडे लेखी सादर करण्यासाठी त्यांच्याकडून आक्षेप व सूचना मागवणारी नोटीस, राजपत्रात जाहिरातीद्वारे आणि दोनपेक्षा कमी नसतील इतक्या स्थानिक वृत्तपत्रांमध्ये जाहिरातीद्वारे, देण्याची व्यवस्था करील. एक महिन्याचा उक्त कालावधी समाप्त झाल्यानंतर, आयुक्त, एक महिन्याच्या आत, त्या आक्षेपांवर व सूचनांवर विचार करील.

(३) मालक, पोट-कलम (१) अन्वये करण्यात आलेल्या घोषणेनुसार आवश्यकतांचे, त्या संदर्भात विनिर्दिष्ट केलेल्या वेळेत, पालन करण्यास कसूर करीत असेल तर, आयुक्तास, घोषणेनुसार पूर्ण करावयाचे काम पार पाडण्यासाठी उपाययोजना करता येतील अथवा तशी व्यवस्था करता येईल ; आणि याबाबतीत महानगरपालिकेने केलेला खर्च, जणू काही उक्त मालकाकडून येणे असलेली त्या इमारतीच्या मालमत्ता कराची थकबाकी असल्याप्रमाणे वसूल करण्यात येईल आणि अशा खर्चाची उक्त मालकाकडे मागणी केल्यावर तो अशा मालकावर देय असेल.

(४) पोट-कलम (३) अन्वये ज्या खर्चाच्या रकमेची मागणी करण्यात आली असेल त्या रकमेबाबत कोणताही विवाद असेल तर, मालकाला, मुख्य न्यायाधीश, लघुवाद न्यायालय यांच्याकडे अपील दाखल करता येईल, परंतु,—

(एक) अशा मागणीची नोटीस मिळाल्याच्या दिनांकापासून एकवीस दिवसांच्या आत ते अपील दाखल करण्यात आले नसेल तर ;

(दोन) ज्या रकमेची मागणी करण्यात आली असेल ती रक्कम महानगरपालिकेकडे जमा करण्यात आली असेल आणि अशा प्रकारे रक्कम जमा करण्यात आल्याचे दर्शविणाऱ्या पावतीची सत्य प्रत अपिलासोबत जोडण्यात आली नसेल तर,

मुख्य न्यायाधीश असे कोणतेही अपील विचारार्थ स्वीकारणार नाही.

(५) जर अपिलावर अपीलकर्त्याच्या बाजूने निर्णय देण्यात आला असेल आणि महानगरपालिकेकडे जमा करण्यात आलेली खर्चाची रक्कम ही, अपीलकर्त्याने द्यावयाच्या रकमेपेक्षा अधिक असेल तर, आयुक्त, ती जादा रक्कम अपीलकर्त्याने अशाप्रकारे जमा केल्याच्या दिनांकापासून दर साल ६.२५ टक्के व्याजासह अशा इमारतीच्याबाबतीत मालकाने त्यानंतर द्यावयाचा मालमत्ता कर म्हणून समायोजित करील.".

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम ५२०क ऐवजी नवीन कलम दाखल करणे.

३. मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ५२०क ऐवजी पुढील कलम दाखल करण्यात येईल :—

"५२०क. या अधिनियमामध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, राज्य शासनास, महानगरपालिकेची कर्तव्ये आणि कार्ये यांबाबत महानगरपालिकेने अनुसरावयाच्या धोरणात्मक बाबीसंबंधात महानगरपालिकेला सर्वसाधारण अनुदेश देता येतील, आणि विशेषत: त्यास व्यापक लोकहितासाठी, किंवा केंद्र सरकारची वा राज्य शासनाची धोरणे आणि राष्ट्रीय वा राज्यस्तरीय कार्यक्रम, प्रकल्प आणि योजना यांची अंमलबजावणी करण्यासाठी, निदेश देता येतील. असे अनुदेश किंवा निदेश दिल्यावर, असे अनुदेश किंवा निदेश अंमलात आणणे हे, महानगरपालिकेचे कर्तव्य असेल : राज्य शासनाचा अनुदेश किंवा निदेश देण्याचा अधिकार.

परंतु, राज्य शासन या कलमाखालील कोणतेही अनुदेश किंवा निदेश देण्यापूर्वी, महानगरपालिकेला असे अनुदेश किंवा निदेश का देण्यात येऊ नयेत याबाबत पंधरा दिवसांच्या आत अभिवेदन सादर करण्याची संधी देईल. महानगरपालिकेने पंधरा दिवसांच्या आत अभिवेदन सादर करण्यास कसूर केली किंवा, अभिवेदन सादर केल्यास, असे अभिवेदन विचारात घेतल्यावर, तसे अनुदेश किंवा निदेश देणे आवश्यक आहे, असे राज्य शासनाचे मत झाले असेल तर, राज्य शासन तसे निदेश देईल.".

## प्रकरण तीन

### मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ याची सुधारणा.

१९४९ चा मुंबई ५९. ४. मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ (यात यापुढे, या प्रकरणात ज्याचा निर्देश "प्रांतिक महानगरपालिका अधिनियम" असा करण्यात आला आहे) याच्या कलम १८५ नंतर, पुढील कलमे समाविष्ट करण्यात येतील :— सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ यामध्ये १८५अ व १८५ब ही कलमे समाविष्ट करणे.

"१८५अ. (१) इमारतीचा दर्शनी भाग सुस्थितीत ठेवण्यात व तसा राखण्यात आला आहे आणि तो नादुरुस्त स्थितीत नाही, अथवा ज्यामुळे इमारतीचे वा तिच्या भागाचे दर्शनी स्वरूप खराब होते अशा प्रकारचे तडे, डाग, गचाळपणाने बंदिस्त केलेल्या जागा, लटकत्या तारा वा केबल किंवा अपायकारक वस्तू ठेवणे यांमुळे तो खराब झालेला नाही, याची खातरजमा करणे ही प्रत्येक इमारत मालकाची किंवा भोगवटादाराची जबाबदारी असेल : इमारतीचा दर्शनी भाग सुस्थितीत ठेवणे व तसा राखणे ही मालक किंवा भोगवटादार यांची जबाबदारी असणे.

परंतु, या कलमातील कोणतीही गोष्ट, महाराष्ट्र झोपडपट्टी (सुधारणा, निर्मूलन व पुनर्विकास) अधिनियम, १९७१ याच्या कलम ४ च्या पोट-कलम (१) अन्वये झोपडपट्टी क्षेत्र म्हणून घोषित करण्यात आलेल्या क्षेत्रांना तसेच ज्या इमारतींच्याबाबत सक्षम प्राधिकरणाने पुनर्विकास आराखडा मंजूर केला आहे किंवा तो सक्षम प्राधिकरणाच्या विचाराधीन आहे, अशा इमारतींना लागू असणार नाही. (१९७१ चा महा. २८.)

(२) आयुक्ताने अशा इमारतींची किंवा तिच्या भागाची तपासणी केल्यावर अशा कोणत्याही इमारतीचा किंवा तिच्या भागाचा दर्शनी हिस्सा सुस्थितीत ठेवण्यात व तसा राखण्यात आलेला नाही आणि पोट-कलम (१) मध्ये नमूद केलेल्या कोणत्याही कारणांमुळे तो खराब झालेला आहे असे आयुक्ताचे मत बनले तर, लेखी नोटिशीद्वारे त्या इमारतीच्या मालकाला किंवा भोगवटादाराला, त्या

इमारतीचा दर्शनी भाग सुस्थितीत ठेवण्यासाठी व तसा राखण्यासाठी त्या नोटिशीमध्ये विनिर्दिष्ट करण्यात येईल असे आवश्यक काम पार पाडण्यास फर्मावता येईल ; आणि तो मालक किंवा यथास्थिति, भोगवटादार त्या नोटिशीचे पालन करील.

(३) इमारतीचा मालक किंवा भोगवटादार, पोट-कलम (२) अन्वये आयुक्ताने दिलेल्या नोटिशीमध्ये नमूद केलेले काम, नोटीस मिळाल्याच्या दिनांकापासून तीस दिवसांच्या आत, किंवा पार पाडावयाच्या कामाचे स्वरूप व व्याप्ती विचारात घेऊन आयुक्त विनिर्दिष्ट करील अशा वाढीव कालावधीच्या आत, पार पाडील.

(४) मालकाने किंवा, यथास्थिति, भोगवटादाराने पोट-कलम (२) खालील नोटिशीचे पालन करण्यात कसूर केली तर, आयुक्त नोटिशीमध्ये नमूद केलेले काम पार पाडण्याची व्यवस्था करील आणि मालक किंवा, यथास्थिति, भोगवटादार, आयुक्ताने त्याबाबतीत केलेला खर्च, मागणी नोटीस मिळाल्याच्या दिनांकापासून तीस दिवसांच्या आत देण्यास जबाबदार असेल आणि अशा मालकाने किंवा भोगवटादाराने खर्च देण्यात कसूर केली तर अशा खर्चाची संपूर्ण रक्कम वसूल होईपर्यंत आयुक्ताने खर्च केलेल्या रकमेवर प्रत्येक महिन्याकरिता किंवा त्याच्या भागाकरिता दोन टक्के या दराने व्याज आकारण्यात येईल.

(५) या कलमामध्ये अन्यथा तरतूद केली असेल त्याव्यतिरिक्त, अशा खर्चाची रक्कम, कोणतेही व्याज असल्यास त्यासह, मालमत्ता कर म्हणून देय असल्याप्रमाणे वसूल करण्यात येईल.

(६) पोट-कलम (४) अन्वये खर्चाच्या ज्या रकमेची मागणी करण्यात आली असेल त्या रकमेविषयी कोणताही विवाद असेल तर, कलम ४०६ खालील ज्या न्यायाधीशाकडे अपील दाखल करण्यात येते त्यांच्याकडे अपील करता येईल, परंतु,—

(एक) अशा मागणीची नोटीस मिळाल्याच्या दिनांकापासून एकवीस दिवसांच्या आत ते अपील दाखल करण्यात आले नसेल तर ;

(दोन) मागणी करण्यात आलेली रक्कम महानगरपालिकेकडे जमा करून अशा प्रकारे रक्कम जमा करण्यात आल्याबाबतच्या पावतीची सत्यप्रत अपीलासोबत जोडण्यात आली नसेल तर,

असा न्यायाधीश असे कोणतेही अपील विचारार्थ स्वीकारणार नाही.

(७) जर अपीलावर अपीलकर्त्याच्या बाजूने निर्णय देण्यात आला असेल आणि महानगरपालिकेकडे जमा करण्यात आलेली खर्चाची रक्कम ही, अपीलकर्त्याने द्यावयाच्या रकमेपेक्षा अधिक असेल तर, आयुक्त, ती जादा रक्कम अपीलकर्त्याने ती अशा प्रकारे जमा केल्याच्या दिनांकापासून दर साल ६.२५ टक्के व्याजासह अशा इमारतीच्या बाबतीत मालकाने त्यानंतर द्यावयाचा मालमत्ता कर म्हणून समायोजित करील.

शहरी सौंदर्याचा सुरेख मिलाफ साधण्याबाबत घोषणा करण्याचा आयुक्ताचा अधिकार.

**१८५ब.** (१) आयुक्तास, राज्य शासनाची मान्यता मिळविल्यानंतर, **राजपत्रातील** अधिसूचनेद्वारे आणि दोनपेक्षा कमी नसतील इतक्या स्थानिक वृत्तपत्रांमधील जाहिरातीद्वारे, अशी घोषणा करता येईल की, एखाद्या विशिष्ट शहरी भागाचे वास्तुशास्त्रीय स्वरूप जपण्याबरोबरच तेथे सौंदर्याचा सुरेख मिलाफ साधण्यासाठी तसेच त्याच्या स्वरूपात सौंदर्यात्मक सुधारणा करून ते अधिक सुशोभित करण्यासाठी, अशा घोषणेच्या प्रसिद्धीच्या दिनांकास अस्तित्वात असलेल्या किंवा त्यानंतर बांधून पूर्ण करण्याचे प्रस्तावित केलेल्या आणि अशा घोषणेमध्ये विनिर्दिष्ट केलेल्या महानगरपालिका क्षेत्रामधील कोणत्याही

वसतिस्थानांच्या अथवा त्याच्या भागातील कोणत्याही सडकेवर स्थित असलेल्या कोणत्याही इमारतीचे वा इमारतींचे दर्शनी स्वरूप, त्यावर कोणत्याही जोडण्या असल्यास आणि त्यांच्या सीमेच्या भिंती, कोणत्याही असल्यास, त्यासह, अशा घोषणेमध्ये नमूद करण्यात येईल अशा रीतीने आणि अशा कालावधीत ठेवण्यात व राखण्यात येईल.

(२) पोट-कलम (१) खालील घोषणेची अधिसूचना प्रसिद्ध करण्यापूर्वी, आयुक्त, अशी घोषणा करण्याचा त्याचा उद्देश स्पष्ट करणारी आणि उक्त प्रस्तावावर कोणताही आक्षेप घेणाऱ्या अथवा त्यावर कोणतीही सूचना करण्यास इच्छुक असलेल्या सर्व व्यक्तींनी त्याबाबतची कारणे देऊन, अशी सूचना राजपत्रात प्रसिद्ध झाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत, आयुक्ताकडे लेखी सादर करण्यासाठी त्यांच्याकडून आक्षेप व सूचना मागविणारी नोटीस, राजपत्रात जाहिरातीद्वारे आणि दोनपेक्षा कमी नसतील इतक्या स्थानिक वृत्तपत्रांमध्ये जाहिरातीद्वारे, देण्याची व्यवस्था करील. एक महिन्याचा उक्त कालावधी समाप्त झाल्यानंतर, आयुक्त, एक महिन्याच्या आत, त्या आक्षेपांवर व सूचनांवर विचार करील.

(३) मालक, पोट-कलम (१) अन्वये, करण्यात आलेल्या घोषणेनुसार आवश्यकतांचे, त्या संदर्भात विनिर्दिष्ट केलेल्या वेळेत, पालन करण्यास कसूर करीत असेल तर, एक महिन्याच्या आत आयुक्तास, घोषणेनुसार पूर्ण करावयाचे काम पार पाडण्यासाठी उपाययोजना करता येतील अथवा तशी व्यवस्था करता येईल ; आणि त्याबाबतीत महानगरपालिकेने केलेला खर्च, जणू काही उक्त मालकाकडून येणे असलेली त्या इमारतीच्या मालमत्ता कराची थकबाकी असल्याप्रमाणे वसूल करण्यात येईल आणि अशा खर्चाची उक्त मालकाकडे मागणी केल्यावर तो अशा मालकावर देय असेल.

(४) पोट-कलम (३) अन्वये ज्या खर्चाच्या रकमेची मागणी करण्यात आली असेल त्या रकमेबाबत कोणताही विवाद असेल तर, मालकाला, या अधिनियमाच्या कलम ४०६ खालील ज्या न्यायाधीशाकडे अपील दाखल करण्यात येते त्यांच्याकडे अपील करता येईल, परंतु,—

(एक) अशा मागणीची नोटीस मिळाल्याच्या दिनांकापासून एकवीस दिवसांच्या आत ते अपील दाखल करण्यात आले नसेल तर ;

(दोन) ज्या रकमेची मागणी करण्यात आली असेल ती रक्कम महानगरपालिकेकडे जमा करण्यात आली असेल आणि अशा प्रकारे रक्कम जमा करण्यात आल्याचे दर्शविणाऱ्या पावतीची सत्यप्रत अपीलासोबत जोडण्यात आली नसेल तर,

असा न्यायाधीश असे कोणतेही अपील विचारार्थ स्वीकारणार नाही.

(५) जर अपीलावर अपीलकर्त्याच्या बाजूने निर्णय देण्यात आला असेल आणि महानगरपालिकेकडे जमा करण्यात आलेली खर्चाची रक्कम ही, अपीलकर्त्याने द्यावयाच्या रकमेपेक्षा अधिक असेल तर, आयुक्त ती जादा रक्कम अपीलकर्त्याने अशा प्रकारे जमा केल्याच्या दिनांकापासून दर साल ६.२५ टक्के व्याजासह अशा इमारतीच्या बाबतीत मालकाने त्यानंतर द्यावयाचा मालमत्ता कर म्हणून समायोजित करील.”.

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ यामध्ये कलम ४५०अ समाविष्ट करणे.

५. प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, याच्या कलम ४५० नंतर, पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :—

राज्य शासनाचा अनुदेश किंवा निदेश देण्याचा अधिकार.

" ४५०अ. या अधिनियमामध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, राज्य शासनास, महानगरपालिकेची कर्तव्ये आणि कार्ये याबाबत महानगरपालिकेने अनुसरावयाच्या धोरणात्मक बाबींसंबंधात महानगरपालिकेला सर्वसाधारण अनुदेश देता येतील, आणि विशेषत: त्यास व्यापक लोकहितासाठी, किंवा केंद्र सरकारची वा राज्य शासनाची धोरणे आणि राष्ट्रीय वा राज्यस्तरीय कार्यक्रम, प्रकल्प आणि योजना यांची अंमलबजावणी करण्यासाठी, निदेश देता येतील. असे अनुदेश किंवा निदेश दिल्यावर, असे अनुदेश किंवा निदेश अंमलात आणणे हे, महानगरपालिकेचे कर्तव्य असेल :

परंतु, राज्य शासन या कलमाखाली कोणतेही अनुदेश किंवा निदेश देण्यापूर्वी, महानगरपालिकेला असे अनुदेश किंवा निदेश का देण्यात येऊ नयेत याबाबत पंधरा दिवसांच्या आत अभिवेदन सादर करण्याची संधी देईल. महानगरपालिकेने पंधरा दिवसांच्या आत अभिवेदन सादर करण्यास कसूर केली किंवा, अभिवेदन सादर केल्यास, असे अभिवेदन विचारात घेतल्यावर, तसे अनुदेश किंवा निदेश देणे आवश्यक आहे, असे राज्य शासनाचे मत झाले असेल तर, राज्य शासन तसे निदेश देईल.".

## प्रकरण चार

### नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ याची सुधारणा.

सन १९५० चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ यामध्ये २८५अ व २८५ब ही कलमे समाविष्ट करणे.

६. नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ (यात यापुढे, या प्रकरणात, ज्याचा निर्देश "नागपूर महानगरपालिका अधिनियम" असा करण्यात आला आहे), याच्या कलम २८५ नंतर, पुढील कलमे समाविष्ट करण्यात येतील :— १९५० चा मध्य प्रांत व वऱ्हाड २.

इमारतीचा दर्शनी भाग सुस्थितीत ठेवणे व तसा राखणे ही मालक किंवा भोगवटादार यांची जबाबदारी असणे.

" २८५अ. (१) इमारतीचा दर्शनी भाग सुस्थितीत ठेवण्यात व तसा राखण्यात आला आहे आणि तो नादुरुस्त स्थितीत नाही, अथवा ज्यामुळे इमारतीचे वा तिच्या भागाचे दर्शनी स्वरूप खराब होते अशा प्रकारचे तडे, डाग, गचाळपणाने बंदिस्त केलेल्या जागा, लटकत्या तारा वा केबल किंवा अपायकारक वस्तू ठेवणे यामुळे तो खराब झालेला नाही, याची खातरजमा करणे ही प्रत्येक इमारत मालकाची किंवा भोगवटादाराची जबाबदारी असेल :

परंतु, या कलमातील कोणतीही गोष्ट, महाराष्ट्र झोपडपट्टी (सुधारणा, निर्मूलन व पुनर्विकास) अधिनियम, १९७१ याच्या कलम ४ च्या पोट-कलम (१) अन्वये झोपडपट्टी क्षेत्र म्हणून घोषित करण्यात आलेल्या क्षेत्रांना तसेच ज्या इमारतींच्याबाबत सक्षम प्राधिकरणाने पुनर्विकास आराखडा मंजूर केला आहे किंवा तो सक्षम प्राधिकरणाच्या विचाराधीन आहे, अशा इमारतींना लागू असणार नाही. १९७१ चा महा. २८.

(२) आयुक्ताने अशा इमारतीची किंवा तिच्या भागाची तपासणी केल्यावर अशा कोणत्याही इमारतीचा किंवा तिच्या भागाचा दर्शनी हिस्सा सुस्थितीत ठेवण्यात व तसा राखण्यात आलेला नाही आणि पोट-कलम (१) मध्ये नमूद केलेल्या कोणत्याही कारणांमुळे तो खराब झालेला आहे असे आयुक्ताचे मत बनले तर, लेखी नोटिशीद्वारे त्या इमारतीच्या मालकाला किंवा भोगवटादाराला, त्या इमारतीचा दर्शनी भाग सुस्थितीत ठेवण्यासाठी व तसा राखण्यासाठी त्या नोटिशीमध्ये विनिर्दिष्ट करण्यात येईल असे आवश्यक काम पार पाडण्यास फर्मावता येईल ; आणि तो मालक किंवा, यथास्थिति, भोगवटादार त्या नोटिशीचे पालन करील.

(३) इमारतीचा मालक किंवा भोगवटादार, पोट-कलम (२) अन्वये आयुक्ताने दिलेल्या नोटिशीमध्ये नमूद केलेले काम, नोटीस मिळाल्याच्या दिनांकापासून तीस दिवसांच्या आत, किंवा पार पाडावयाच्या कामाचे स्वरूप व व्याप्ती विचारात घेऊन आयुक्त विनिर्दिष्ट करील अशा वाढीव कालावधीच्या आत, पार पाडील.

(४) मालकाने किंवा, यथास्थिति, भोगवटादाराने पोट-कलम (२) खालील नोटिशीचे पालन करण्यात कसूर केली तर आयुक्त नोटिशीमध्ये नमूद केलेले काम पार पाडण्याची व्यवस्था करील आणि मालक किंवा, यथास्थिति, भोगवटादार, आयुक्ताने त्याबाबतीत केलेला खर्च, मागणी नोटीस मिळाल्याच्या दिनांकापासून तीस दिवसांच्या आत देण्यास जबाबदार असेल आणि अशा मालकाने किंवा भोगवटादाराने खर्च देण्यात कसूर केली तर, अशा खर्चाची संपूर्ण रक्कम वसूल होईपर्यंत आयुक्ताने खर्च केलेल्या रकमेवर प्रत्येक महिन्याकरिता किंवा त्याच्या भागाकरिता दोन टक्के या दराने व्याज आकारण्यात येईल.

(५) या कलमामध्ये अन्यथा तरतूद केली असेल त्याव्यतिरिक्त, अशा खर्चाची रक्कम, कोणतेही व्याज असल्यास त्यासह, मालमत्ता कर म्हणून देय असल्याप्रमाणे वसूल करण्यात येईल.

(६) पोट-कलम (४) अन्वये खर्चाच्या ज्या रकमेची मागणी करण्यात आली असेल त्या रकमेविषयी कोणताही विवाद असेल तर, जिल्हा न्यायालय यांच्याकडे अपील करता येईल, परंतु,—

(एक) अशा मागणीची नोटीस मिळाल्याच्या दिनांकापासून एकवीस दिवसांच्या आत ते अपील दाखल करण्यात आले नसेल तर ;

(दोन) मागणी करण्यात आलेली रक्कम महानगरपालिकेकडे जमा करून अशा प्रकारे रक्कम जमा करण्यात आल्याबाबतच्या पावतीची सत्य प्रत अपीलासोबत जोडण्यात आली नसेल तर,

असे न्यायालय असे कोणतेही अपील विचारार्थ स्वीकारणार नाही.

(७) जर अपीलावर अपीलकर्त्याच्या बाजूने निर्णय देण्यात आला असेल आणि महानगरपालिकेकडे जमा करण्यात आलेली खर्चाची रक्कम ही, अपीलकर्त्याने द्यावयाच्या रकमेपेक्षा अधिक असेल तर, आयुक्त, ती जादा रक्कम अपीलकर्त्याने ती अशा प्रकारे जमा केल्याच्या दिनांकापासून दर साल ६.२५ टक्के व्याजासह अशा इमारतीच्या बाबतीत मालकाने त्यानंतर द्यावयाच्या मालमत्ता कर म्हणून समायोजित करील.

शहरी सौंदर्याचा सुरेख मिलाफ साधण्याबाबत घोषणा करण्याचा आयुक्ताचा अधिकार.

२८५ब. (१) आयुक्तास, राज्य शासनाची मान्यता मिळविल्यानंतर, राजपत्रातील अधिसूचनेद्वारे आणि दोनपेक्षा कमी नसतील इतक्या स्थानिक वृत्तपत्रांमधील जाहिरातीद्वारे, अशी घोषणा करता येईल की, एखाद्या विशिष्ट शहरी भागाचे वास्तुशास्त्रीय स्वरूप जपण्याबरोबरच तेथे सौंदर्याचा सुरेख मिलाफ साधण्यासाठी तसेच त्याच्या स्वरूपात सौंदर्यात्मक सुधारणा करून ते अधिक सुशोभित करण्यासाठी, अशा घोषणेच्या प्रसिद्धीच्या दिनांकास अस्तित्वात असलेल्या किंवा त्यानंतर बांधून पूर्ण करण्याचे प्रस्तावित केलेल्या आणि अशा घोषणेमध्ये विनिर्दिष्ट केलेल्या महानगरपालिका क्षेत्रामधील कोणत्याही वसतिक्षेत्रातील अथवा त्याच्या भागातील कोणत्याही सडकेवर स्थित असलेल्या कोणत्याही इमारतीचे वा इमारतींचे दर्शनी स्वरूप, त्यावर कोणत्याही जोडण्या असल्यास आणि त्यांच्या सीमेच्या भिंती, कोणत्याही असल्यास, त्यासह, अशा घोषणेमध्ये नमूद करण्यात येईल अशा रीतीने आणि अशा कालावधीत ठेवण्यात व राखण्यात येईल.

(२) पोट-कलम (१) खालील घोषणेची अधिसूचना प्रसिद्ध करण्यापूर्वी, आयुक्त, अशी घोषणा करण्याचा त्याचा उद्देश स्पष्ट करणारी आणि उक्त प्रस्तावावर कोणताही आक्षेप घेणाऱ्या अथवा त्यावर कोणतीही सूचना करण्यास इच्छुक असलेल्या सर्व व्यक्तींनी त्याबाबतची कारणे देऊन, अशी सूचना राजपत्रात प्रसिद्ध झाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत, आयुक्ताकडे लेखी सादर करण्यासाठी त्यांच्याकडून आक्षेप व सूचना मागवणारी नोटीस, राजपत्रात जाहिरातीद्वारे आणि दोनपेक्षा कमी नसतील इतक्या स्थानिक वृत्तपत्रांमध्ये जाहिरातीद्वारे, देण्याची व्यवस्था करील. एक महिन्याचा उक्त कालावधी समाप्त झाल्यानंतर, आयुक्त, एक महिन्याच्या आत, त्या आक्षेपांवर व सूचनांवर विचार करील.

(३) मालक, पोट-कलम (१) अन्वये, करण्यात आलेल्या घोषणेनुसार आवश्यकतांचे, त्या संदर्भात विनिर्दिष्ट केलेल्या वेळेत, पालन करण्यास कसूर करीत असेल तर, आयुक्तास, घोषणेनुसार पूर्ण करावयाचे काम पार पाडण्यासाठी उपाययोजना करता येतील अथवा तशी व्यवस्था करता येईल ; आणि याबाबतीत महानगरपालिकेने केलेला खर्च, जणू काही उक्त मालकाकडून येणे असलेली त्या इमारतीच्या मालमत्ता कराची थकबाकी असल्याप्रमाणे वसूल करण्यात येईल आणि अशा खर्चाची उक्त मालकाकडे मागणी केल्यावर तो अशा मालकावर देय असेल.

(४) पोट-कलम (३) अन्वये ज्या खर्चाच्या रकमेची मागणी करण्यात आली असेल त्या रकमेबाबत कोणताही विवाद असेल तर, मालकाला, जिल्हा न्यायालयाकडे अपील दाखल करता येईल, परंतु,—

(एक) अशा मागणीची नोटीस मिळाल्याच्या दिनांकापासून एकवीस दिवसांच्या आत ते अपील दाखल करण्यात आले नसेल तर ;

(दोन) ज्या रकमेची मागणी करण्यात आली असेल ती रक्कम महानगरपालिकेकडे जमा करण्यात आली असेल आणि अशा प्रकारे रक्कम जमा करण्यात आल्याचे दर्शविणाऱ्या पावतीची सत्य प्रत अपीलासोबत जोडण्यात आली नसेल तर,

असे न्यायालय असे कोणतेही अपील विचारार्थ स्वीकारणार नाही.

(५) जर अपीलावर अपीलकर्त्याच्या बाजूने निर्णय देण्यात आला असेल आणि महानगरपालिकेकडे जमा करण्यात आलेली खर्चाची रक्कम ही, अपीलकर्त्याने द्यावयाच्या रकमेपेक्षा अधिक असेल तर, आयुक्त, ती जादा रक्कम अपीलकर्त्याने अशाप्रकारे जमा केल्याच्या दिनांकापासून दर साल ६.२५ टक्के व्याजासह अशा इमारतीच्याबाबतीत मालकाने त्यानंतर द्यावयाचा मालमत्ता कर म्हणून समायोजित करील. ".

७. नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ४०४ नंतर पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :—

सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ यामध्ये कलम ४०४अ समाविष्ट करणे.

" ४०४अ. या अधिनियमामध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, राज्य शासनास, महानगरपालिकेची कर्तव्ये आणि कार्य याबाबत महानगरपालिकेने अनुसरावयाच्या धोरणात्मक बाबींसंबंधात महानगरपालिकेला सर्वसाधारण अनुदेश देता येतील आणि विशेषतः व्यापक लोकहितासाठी, किंवा केंद्र सरकारची वा राज्य शासनाची धोरणे आणि राष्ट्रीय वा राज्यस्तरीय कार्यक्रम, प्रकल्प आणि योजना यांची अंमलबजावणी करण्यासाठी, निदेश देता येतील असे अनुदेश किंवा निदेश दिल्यावर, असे अनुदेश किंवा निदेश अंमलात आणणे हे महानगरपालिकेचे कर्तव्य असेल :

राज्य शासनाचा अनुदेश किंवा निदेश देण्याचा अधिकार.

परंतु, राज्य शासन या कलमाखालील कोणतेही अनुदेश किंवा निदेश देण्यापूर्वी, महानगरपालिकेला असे अनुदेश किंवा निदेश का देण्यात येऊ नयेत याबाबत पंधरा दिवसांच्या आत अभिवेदन सादर करण्याची संधी देईल. महानगरपालिकेने पंधरा दिवसांच्या आत अभिवेदन सादर करण्यास कसूर केली किंवा, अभिवेदन सादर केल्यास, असे अभिवेदन विचारात घेतल्यावर, असे अनुदेश किंवा निदेश देणे आवश्यक आहे, असे राज्य शासनाचे मत झाले असेल तर, राज्य शासन असे निदेश देईल.".

## प्रकरण पाच

**महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ यांची सुधारणा.**

१९६५ चा महा. ४०. ८. महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ (यात यापुढे या प्रकरणात, ज्याचा निर्देश " नगरपरिषदा अधिनियम " असा करण्यात आला आहे) याच्या कलम १९४ नंतर, पुढील कलमे समाविष्ट करण्यात येतील :—

सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० यामध्ये १९४अ व १९४ब ही कलमे समाविष्ट करणे.

" १९४अ. (१) इमारतीचा दर्शनी भाग सुस्थितीत ठेवण्यात व तसा राखण्यात आला आहे आणि तो नादुरुस्त स्थितीत नाही, अथवा ज्यामुळे इमारतीचे वा तिच्या भागाचे दर्शनी स्वरूप खराब होते अशाप्रकारचे तडे, डाग, गचाळपणाने बंदिस्त केलेल्या जागा, लटकत्या तारा वा केबल किंवा अपायकारक वस्तू ठेवणे यांमुळे तो खराब झालेला नाही, याची खातरजमा करणे ही प्रत्येक इमारत मालकाची किंवा भोगवटादाराची जबाबदारी असेल :

इमारतीचा दर्शनी भाग सुस्थितीत ठेवणे व तसा राखणे ही मालक किंवा भोगवटादार यांची जबाबदारी असणे.

परंतु, या कलमातील कोणतीही गोष्ट, महाराष्ट्र झोपडपट्टी (सुधारणा, निर्मूलन व पुनर्विकास) अधिनियम, १९७१ याच्या कलम ४ च्या पोट-कलम (१) अन्वये झोपडपट्टी क्षेत्र म्हणून घोषित करण्यात आलेल्या क्षेत्रांना तसेच ज्या इमारतींच्या बाबत प्राधिकरणाने पुनर्विकास आराखडा मंजूर केला आहे अशा इमारतींना लागू असणार नाही. १९७१ चा महा. २८.

(२) मुख्याधिकाऱ्याने अशा इमारतीची किंवा तिच्या भागाची तपासणी केल्यावर अशा कोणत्याही इमारतीचा किंवा तिच्या भागाचा दर्शनी हिस्सा सुस्थितीत ठेवण्यात व तसा राखण्यात आलेला नाही आणि पोट-कलम (१) मध्ये नमूद केलेल्या कोणत्याही कारणांमुळे तो खराब झालेला आहे असे मुख्याधिकाऱ्याचे मत बनले तर, लेखी नोटिशीद्वारे त्या इमारतीच्या मालकाला किंवा भोगवटादाराला, त्या इमारतीचा दर्शनी भाग सुस्थितीत ठेवण्यासाठी व तसा राखण्यासाठी त्या नोटिशीमध्ये विनिर्दिष्ट करण्यात येईल असे आवश्यक काम पार पाडण्यास फर्मावता येईल ; आणि तो मालक किंवा, यथास्थिति, भोगवटादार त्या नोटिशीचे पालन करील.

(३) इमारतीचा मालक किंवा भोगवटादार, पोट-कलम (२) अन्वये मुख्याधिकाऱ्याने दिलेल्या नोटिशीमध्ये नमूद केलेले काम, नोटीस मिळाल्याच्या दिनांकापासून तीस दिवसांच्या आत, किंवा पार पाडावयाच्या कामाचे स्वरूप व व्याप्ती विचारात घेऊन मुख्याधिकारी विनिर्दिष्ट करील अशा वाढीव कालावधीच्या आत, पार पाडील.

(४) मालकाने किंवा, यथास्थिति, भोगवटादाराने पोट-कलम (२) खालील नोटिशीचे पालन करण्यात कसूर केली तर, मुख्याधिकारी नोटिशीमध्ये नमूद केलेले काम पार पाडण्याची व्यवस्था करील आणि मालक किंवा, यथास्थिति, भोगवटादार, मुख्याधिकाऱ्याने त्याबाबतीत केलेला खर्च, मागणी नोटीस मिळाल्याच्या दिनांकापासून तीस दिवसांच्या आत देण्यास जबाबदार असेल आणि अशा मालकाने किंवा भोगवटादाराने खर्च देण्यात कसूर केली तर अशा खर्चाची संपूर्ण रक्कम वसूल होईपर्यंत मुख्याधिकाऱ्याने खर्च केलेल्या रकमेवर प्रत्येक महिन्याकरिता किंवा त्याच्या भागाकरिता दोन टक्के या दराने व्याज आकारण्यात येईल.

(५) या कलमामध्ये अन्यथा तरतूद केली असेल त्याव्यतिरिक्त, अशा खर्चाची रक्कम, कोणतेही व्याज असल्यास त्यासह, मालमत्ता कर म्हणून देय असल्याप्रमाणे वसूल करण्यात येईल.

(६) पोट-कलम (४) अन्वये खर्चाच्या ज्या रकमेची मागणी करण्यात आली असेल त्या रकमेविषयी कोणताही विवाद असेल तर, कलम १६९ मधील पोट-कलम (२) खाली गठीत केलेल्या मालमत्ता कर अपील समितीकडे अपील करता येईल, परंतु,—

(एक) अशा मागणीची नोटीस मिळाल्याच्या दिनांकापासून एकवीस दिवसांच्या आत ते अपील दाखल करण्यात आले नसेल तर ;

(दोन) मागणी करण्यात आलेली रक्कम नगरपरिषदेकडे जमा करून अशाप्रकारे रक्कम जमा करण्यात आल्याबाबतच्या पावतीची सत्य प्रत अपीलासोबत जोडण्यात आली नसेल तर,

उक्त समिती असे कोणतेही अपील विचारार्थ स्वीकारणार नाही.

(७) जर अपीलावर अपीलकर्त्याच्या बाजूने निर्णय देण्यात आला असेल आणि नगरपरिषदेकडे जमा करण्यात आलेली खर्चाची रक्कम ही, अपीलकर्त्याने द्यावयाच्या रकमेपेक्षा अधिक असेल तर, मुख्याधिकारी, ती जादा रक्कम अपीलकर्त्याने ती अशा प्रकारे जमा केल्याच्या दिनांकापासून दर साल ६.२५ टक्के व्याजासह अशा इमारतीच्या संबंधातील मालकाने त्यानंतर द्यावयाचा मालमत्ता कर म्हणून समायोजित करील.

[illegible] (१) मुख्याधिकाऱ्यास, राज्य शासनाची मान्यता मिळाल्यानंतर, राजपत्रातील अधिसूचनेद्वारे आणि दोनपेक्षा कमी नसतील इतक्या स्थानिक वृत्तपत्रांमधील जाहिरातीद्वारे, अशी घोषणा करता येईल की, एखाद्या विशिष्ट शहरी भागाचे वास्तुशास्त्रीय स्वरूप जपण्याबरोबरच तेथे सौंदर्याचा सुरेख मिलाफ साधण्यासाठी तसेच त्याच्या स्वरूपात सौंदर्यात्मक सुधारणा करून ते अधिक सुशोभित करण्यासाठी, अशा घोषणेच्या प्रसिद्धीच्या दिनांकास अस्तित्वात असलेल्या किंवा त्यानंतर बांधून पूर्ण करण्याचे प्रस्तावित केलेल्या आणि अशा घोषणेमध्ये विनिर्दिष्ट केलेल्या नगरपरिषद क्षेत्रामधील कोणत्याही वसतिक्षेत्रातील अथवा त्याच्या भागातील कोणत्याही सडकेवर स्थित असलेल्या कोणत्याही इमारतीचे वा इमारतींचे दर्शनी स्वरूप, त्यावर कोणत्याही जोडण्या असल्यास आणि त्यांच्या सीमेच्या भिंती, कोणत्याही असल्यास, त्यासह, अशा घोषणेमध्ये नमूद करण्यात येईल अशा रीतीने आणि अशा कालावधीत ठेवण्यात व राखण्यात येईल.

शहरी सौंदर्याचा सुरेख मिलाफ साधण्याबाबत घोषणा करण्याचा मुख्याधिकाऱ्याचा अधिकार.

(२) पोट-कलम (१) खालील घोषणेची अधिसूचना प्रसिद्ध करण्यापूर्वी, मुख्याधिकारी, अशी घोषणा करण्याचा त्याचा उद्देश स्पष्ट करणारी आणि उक्त प्रस्तावावर कोणताही आक्षेप घेणाऱ्या अथवा त्यावर कोणतीही सूचना करण्यास इच्छुक असलेल्या सर्व व्यक्तींनी त्यासंबंधीची कारणे देऊन, अशी सूचना राजपत्रात प्रसिद्ध झाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत, मुख्याधिकाऱ्याकडे लेखी सादर करण्यासाठी त्यांच्याकडून आक्षेप व सूचना मागवणारी नोटीस, राजपत्रात जाहिरातीद्वारे आणि दोनपेक्षा कमी नसतील इतक्या स्थानिक वृत्तपत्रांमध्ये जाहिरातीद्वारे, देण्याची व्यवस्था करील. एक महिन्याचा उक्त कालावधी समाप्त झाल्यानंतर, मुख्याधिकारी, एक महिन्याच्या आत, त्या आक्षेपांवर व सूचनांवर विचार करील.

(३) मालक, पोट-कलम (१) अन्वये, करण्यात आलेल्या घोषणेनुसार आवश्यकतांचे, त्या संदर्भात विनिर्दिष्ट केलेल्या वेळेत, पालन करण्यास कसूर करीत असेल तर, मुख्याधिकाऱ्यास, घोषणेनुसार पूर्ण करावयाचे काम पार पाडण्यासाठी उपाययोजना करता येतील अथवा तशी व्यवस्था करता येईल ; आणि याबाबतीत नगरपरिषदेने केलेला खर्च, जणू काही उक्त मालकाकडून येणे असलेली त्या इमारतीच्या मालमत्ता कराची थकबाकी असल्याप्रमाणे वसूल करण्यात येईल आणि अशा खर्चाची उक्त मालकाकडे मागणी केल्यावर तो अशा मालकावर देय असेल.

(४) पोट-कलम (३) अन्वये ज्या खर्चाच्या रकमेची मागणी करण्यात आली असेल त्या रकमेबाबत कोणताही विवाद असेल तर, मालकाला, या अधिनियमाच्या कलम १६९ मधील पोट-कलम (२) खाली गठित केलेल्या मालमत्ता कर अपील समितीकडे अपील दाखल करता येईल, परंतु,—

(एक) अशा मागणीची नोटीस मिळाल्याच्या दिनांकापासून एकवीस दिवसांच्या आत ते अपील दाखल करण्यात आले नसेल तर ;

(दोन) ज्या रकमेची मागणी करण्यात आली असेल ती रक्कम नगरपरिषदेकडे जमा करण्यात आली असेल आणि अशाप्रकारे रक्कम जमा करण्यात आल्याचे दर्शविणाऱ्या पावतीची सत्य प्रत अपिलासोबत जोडण्यात आली नसेल तर,—

उक्त समिती असे कोणतेही अपील विचारार्थ स्वीकारणार नाही.

(५) जर अपिलावर अपीलकर्त्यांच्या बाजूने निर्णय देण्यात आला असेल आणि नगरपरिषदेकडे जमा करण्यात आलेली खर्चाची रक्कम ही, अपीलकर्त्याने द्यावयाच्या रकमेपेक्षा अधिक असेल तर, मुख्याधिकारी, ती जादा रक्कम अपीलकर्त्याने अशाप्रकारे जमा केल्याच्या दिनांकापासून दर साल ६.२५ टक्के व्याजासह अशा इमारतीच्याबाबतीत मालकाने त्यानंतर द्यावयाचा मालमत्ता कर म्हणून समायोजित करील. ".

सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० यामध्ये कलम ३१२अ समाविष्ट करणे.

९. नगरपरिषदा अधिनियमाच्या कलम ३१२ नंतर, पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :—

राज्य शासनाचा अनुदेश किंवा निदेश देण्याचा अधिकार.

" ३१२अ. या अधिनियमामध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, राज्य शासनास, परिषदेची कर्तव्ये आणि कार्य याबाबत परिषदेने अनुसरावयाच्या धोरणात्मक बाबींसंबंधात परिषदेला सर्वसाधारण अनुदेश देता येतील, आणि विशेषतः त्यास व्यापक लोकहितासाठी; किंवा केंद्र सरकारची वा राज्य शासनाची धोरणे आणि राष्ट्रीय वा राज्यस्तरीय कार्यक्रम, प्रकल्प आणि योजना यांची अंमलबजावणी करण्यासाठी; निदेश देता येतील. असे अनुदेश किंवा निदेश दिल्यावर, असे अनुदेश किंवा निदेश अंमलात आणणे हे, परिषदेचे कर्तव्य असेल :

परंतु, राज्य शासन या कलमाखाली कोणतेही अनुदेश किंवा निदेश देण्यापूर्वी, नगरपरिषदेला असे अनुदेश किंवा निदेश का देण्यात येऊ नयेत याबाबत पंधरा दिवसांच्या आत अभिवेदन सादर करण्याची संधी देईल. नगरपरिषदेने पंधरा दिवसांच्या आत अभिवेदन सादर करण्यास कसूर केली किंवा, अभिवेदन सादर केल्यास, असे अभिवेदन विचारात घेतल्यावर, तसे अनुदेश किंवा निदेश देणे आवश्यक आहे, असे राज्य शासनाचे मत झाले असेल तर, राज्य शासन तसे निदेश देईल.".

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHED BY SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004. EDITOR : SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI.

RNI No. MAHBIL/35528



# महाराष्ट्र शासन राजपत्र
# असाधारण भाग आठ

वर्ष ३, अंक ५(४) ] रविवार, एप्रिल ३, २०११/चैत्र १३, शके १९३३ [ पृष्ठे १४, किंमत : रुपये १४.००

**असाधारण क्रमांक ३८**

**प्राधिकृत प्रकाशन**

**महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम आणि विधी व न्याय विभागाकडून आलेली विधेयके (इंग्रजी अनुवाद).**

In pursuance of clause (3) of article 348 of the Constitution of India, the following translation in English of the Maharashtra Municipal Corporations and Municipal Councils (Amendment) Act, 2010 (Mah. Act No. IX of 2011), is hereby published under the authority of the Governor.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

H. B. PATEL,
Secretary to Government,
Law and Judiciary Department.

---

## MAHARASHTRA ACT No. IX OF 2011.

*(First published, after having received the assent of the Governor in the* "Maharashtra Government Gazette", *on the 3rd April 2011).*

An Act further to amend the Mumbai Municipal Corporation Act, the Bombay Provincial Municipal Corporations Act, 1949, the City of Nagpur Corporation Act, 1948 and the Maharashtra Municipal Councils, Nagar Panchayats and Industrial Townships Act, 1965.

Bom.III of 1888. Bom. LIX of 1949. C.P. and Berar II of 1950. Mah. XL of 1965.

WHEREAS it is expedient further to amend the Mumbai Municipal Corporation Act, the Bombay Provincial Municipal Corporations Act, 1949, the City of Nagpur Corporation Act, 1948 and the Maharashtra Municipal Councils, *Nagar Panchayats* and Industrial Townships Act,

